**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील १६ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.२८/परि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १९ मार्च, २०२०.

**वाचा :-** १) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी १२६७/७६९१३-XII, मुंबई, दि. १ नोव्हेंबर १९६८
२) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी १२७२/८६९७-XII-B, मुंबई, दि. ९ मे १९७४
३) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०१७६/३-XXXV-TR,मुंबई, दि. ३० ऑगस्ट १९७७
४) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी ०१८९/७५६ (अ)/परि-७, मुंबई, दि.३१ ऑक्टोबर १९९२
५) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०९०६/११५४/प्र.क्र.२०९/परि-५, दि.१५ जानेवारी २००७
६) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०८०५/९१९/प्र.क्र.१४५/परि-५, दि. २ मार्च २००७
७) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी २०१७/प्र.क्र.२८/परि-५, दिनांक १०.१०.२०१९
८) प्र.प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,मुंबई यांचे दिनांक ०७.०३.२०२० चे पत्र.
९) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

मुंबई जिल्ह्यासाठी एकूण ८ मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापन करण्यात आलेली असून सदर न्यायाधिकरणाच्या आस्थापनेवर एकूण ११९ पदे निर्माण केलेली आहेत. उपरोक्त संदर्भ क्र.१ ते ६ येथील शासन निर्णयानुसार एकूण १०३ पदे स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरित १६ पदे अस्थायी असून सदर पदांना संदर्भ क्र. ७ च्या शासन निर्णयानुसार दिनांक ०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर १६ पदांची मुदत दिनांक २९.०२.२०२० रोजी संपुष्टात येत आहे. प्र.प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांनी आता सदर १६ पदांना दिनांक ०१.०३.२०२० पासून पुढे मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.८ येथील पत्रान्वये शासनास सादर केला असून सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील खालील १६ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे मे, २०२० व ऑगस्ट, २०२० अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच दिनांक ०१.०३.२०२० रोजी प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के प्रलंबित दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

पदांचा तपशील खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | सदस्य | २ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी ०९०१/११६५/११७-अ /परि-५, दि. २.१२.२००३ |
| २. | शिरस्तेदार | २ | वरीलप्रमाणे. |
| ३. | उच्चश्रेणी लघुलेखक | १ | वरीलप्रमाणे. |
| ४. | शिपाई | २ | वरीलप्रमाणे. |
| ५. | हवालदार | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी ७९०१/११६५/११७-ब /परि-५ दि. २.१२.२००३ |
| ६. | बेलिफ | २ | वरीलप्रमाणे. |
| ७. | दुभाषिक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी ०९०१/ ११६३/ सीआर-११७-क/परि-५<br>दि. २०.०६.२००२ |
| ८. | लिपिक-टंकलेखक | २ | वरीलप्रमाणे. |
| ९. | सहायक अधिक्षक | १ | वरीलप्रमाणे. |
| १० | लिपिक टंकलेखक | २ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी ०१८२/२/सीआर-८९ /परि-५, दि. ३०.०९.१९८५. |
| **एकूण पदे** | | **१६** | |

२. या बाबीवरील होणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१-वाहनांवरील कर, (००) ८००-इतर खर्च, (००) (०१)-मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१९१७३६२८४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysen
Jayprakash Ingole

Digitally signed by Jaysen Jayprakash Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1cc346c90ac68bdb6b1a84cb00c640524cb8ed1b6ae18a394fb20420edf51af, serialNumber=7c9e48ac69f313deeccd6e9eeceea57a822c9d8ccacd64dd1c5031b045e7c1f2, cn=Jaysen Jayprakash Ingole
Date: 2020.03.19 17:39:03 +05'30'

**( जयसेन जयप्रकाश इंगोले )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव, (बीयुडी-१/ परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती / परिवहन-५.